**गृह विभागाला कायदेशिर बाबींवर सल्लादेणे/ न्यायालयीन प्रकरणी विभागाची बाजू मांडणे/ शासन निर्णय, कायदा इत्यादिंचे प्रारुप तयार करणे यासंदर्भातील सेवा घेण्यासाठी बाह्यस्त विधी सल्लागार कंपन्यांची नामिकासूची (Empanalment) तयार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः- संकीण-२०१६/प्र.क्र.१०६/विशा-३ अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
दिनांक :- १८ जानेवारी, २०१७

प्रस्तावना :-

विभागातील कायदेविषयक बाबींवर कार्यवाही करतांना विहीत कालमर्यादेचे पालन करणे आवश्यक असते. शासन निर्णय, परिपत्रके, अधिनियम तयार करतांना प्रचलित नियम/कायदे याअनुषंगाने विसंगती होणार नाही याची दक्षता घ्यावी लागते. अशा स्वरुपाची विधी विषयक बाबी हाताळतांना अधिकारी/कर्मचारी यांचेकडून त्रृटी राहण्याची शक्यता असते.त्यामुळे, तसेच मुळ कायदे, नियम, अधिनियम, अधिसूचना यांचे प्रारुप तयार करणे, अस्तित्वात असलेले कायदे/नियम/अधिनियम इत्यादि मध्ये बदल करणे व त्याचे प्रारुप तयार करणे, तसेच विभागाला कायदेविषयक सल्ला देणे, विभागाचे करार व इतर कायदेशीर कागदपत्रांचे प्रारुप तयार करणे, आवश्यकतेनुसार मा.उच्च न्यायालय, मा.सर्वोच्च न्यायालय, लवाद, प्राधिकरण येथे विभागाची बाजू मांडणे, प्रचलित कायदे नियम इत्यादिंचा अर्थ लावणे, तसेच विभागास विधिविषयक सल्ला देणे इत्यादि सेवा पुरविण्यासाठी विधी सल्लागार कंपन्यांची नामिकासूची (Empanelment) तयार करण्याच्या आवश्यकतेबाबत, अ.मु.स. (गृह) यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या विविध बैठकींमध्ये चर्चा झालेली होती.

३. उपरोक्त बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने वृत्तपत्रांमध्ये स्वारस्य अभिव्यक्ती (Expression of Interest) सादर करण्याबाबत जाहिरात प्रसिध्द केली असता, एकुण १२ विधी सल्लागार संस्थांनी आपले स्वारस्य सादर केले. अ.मु.स.(गृह) यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीच्या बैठकीत सदर संस्थांनी केलेले सादरीकरण व कागदपत्रे यांचे आधारे तांत्रिक मुल्यमापन करण्यात येऊन विहीत कार्यपध्दतीचे पालन करुन वर नमूद १२ विधी सल्लागार संस्थांपैकी पुढील १) लक्ष्मीकुमारन व श्रीधरन (Laxmikumaran & Sridharan) २) लिंक लिगल इंडीया लॉ सर्व्हीसेस,(Link Legal India Law Services) व ३) तुली ॲन्ड कंपनी (Tuli & Co.) या तीन कंपन्या विहित केलेल्या तांत्रिक बाबींची पुर्तता करित असल्याचे दिसून आले. तसेच या संस्थांना Empanle करण्याबाबत विभागाच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२८.११.२०१६ च्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. आता सदरहू कंपन्यांना बाह्यस्त विधी सल्लागार म्हणून नामिकासूचीवर (Empanalment) समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संस्थांना Empanel केल्यानंतर विभागातमील मूळ कायदे, नियम, अधिनियम, अधिसूचना यांचे प्रारुप तयार करणे, अस्तित्वात असलेल्या कायदे/नियम/अधिनियम इत्यादिंमध्ये बदल करण्याचे प्रारुप तयार करणे, विभागाला आवश्यकतेनुसार कायदेविषयक सल्ला / मत देणे, विभागाचे करार व इतर कायदेशीर कागदपत्रांचे प्रारुप तयार करणे, आवश्यकतेनुसार मा.उच्च न्यायालय, मा.सर्वोच्च न्यायालय, लवाद, प्राधिकरण येथे विभागावतीने बाजू मांडणे, प्रचलित कायदे नियम इत्यादिंचा अर्थ लावणे, तसेच विभागातून अन्य विधी विषयक बाबींकरिता सल्ला मागितल्यास तो देणे या बाबींची सेवा पूरविण्यासाठी,

१) लक्ष्मीकुमारन व श्रीधरन (Laxmikumaran & Sridharan),
 २रा मजला, बी ॲन्ड सी विंग, सीनर्जी, आप्पासाहेब मराठे मार्ग, प्रभादेवी, मुंबई-२५,
२) लिंक लिगल इंडीया लॉ सर्व्हीसेस,(Link Legal India Law Services),
 दुबाश हाऊस, २रा माळा, १५ जे.एन.हेरेडीया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-०१.
३) तुली ॲन्ड कंपनी (Tuli & Co.)
 ५१३ बी विंग, बोनांझा सहार प्लाझा, एम व्ही रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई ४०००५९

या तीन कंपन्यांना बाह्यस्त विधी सल्लागार म्हणून या विभागाच्या नामिकासूचीवर (Empanalment) हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासुन ३ वर्षाच्या कालावधी करिता घेण्यास, शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संस्थांना Empanel केल्यास तदनंतर उपरोक्त बाबींकरिता वर नमूद संस्थांचे अभिप्राय घ्यावयाचे असल्यास Empanel संस्थांकरिता आवश्यक असलेल्या बाबींचे Scope of Work देण्यात येईल. त्याआधारे सदर संस्थांकडून त्यांचे दरपत्रक, सद र कामाकरिता लागणारा वेळ, आवश्यक मनुष्यबळ व त्यास लागणारा खर्च मागविण्यात येईल. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यावर तांत्रिक बाबी तपासण्याकरिता विधी व न्याय विभाग व खर्चाच्या मंजुरीकरिता वित्त विभागाची मान्यता घेण्यात येईल. दोन्ही विभागाकडून प्रस्ताव मान्य झाल्यास संस्थेस कार्यादेश निर्गमित करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११८१४५६४८९२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh M. Khade

Digitally signed by Suresh M. Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b9c3bfe0cf5832f9fb73e937c85fff475ad0238a20da77ce26bb6669f386614, cn=Suresh M. Khade
Date: 2017.01.18 15:01:27 +05'30'

**(सुरेश खाडे)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध), मुंबई

४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
७. लक्ष्मीकुमारन व श्रीधरन (Laxmikumaran & Sridharan), २रा मजला, बी ॲन्ड सी विंग, सीनर्जी, आप्पासाहेब मराठे मार्ग, प्रभादेवी, मुंबई-२५,
८. लिंक लिगल इंडीया लॉ सर्व्हीसेस,(Link Legal India Law Services), दुबाश हाऊस, २रा माळा, १५ जे.एन.हेरेडीया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-०१.
९. तुली ॲन्ड कंपनी (Tuli & Co.) ५१३ बी विंग, बोनांझा सहार प्लाझा, एम व्ही रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई ४०००५९

**प्रत,**

निवडनस्ती/ गृह विभाग-विशा-३